# महाराष्ट्र शासन

**क्रमांक :** घबाअ-०११/(४)/(प्र.क्र.४७/११)/पाच,
विधी व न्याय विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

**दिनांक :** १८ आक्टोबर, २०११.

प्रति

अपर प्रबंधक,
उच्च न्यायालय (अ.शा./मू.शा.),
मुंबई.

विषय :- घरबांधणी अग्रिम धन प्रमाणित करणेबाबत
सन २०११-२०१२.

**महोदय,**

उपरोक्त विषयांसंदर्भात आदेशावरुन, मा.मुख्य न्यायमूर्तींच्या माहितीकरिता, आपणांस असे कळविण्यात येते की, सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेल्या **४१** अर्जदारांची माहिती, अग्रीम प्रमाणित करण्यासाठी छाननीनंतर योग्य आढळून आलेली आहे. त्यांना सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मुंबई वित्तीय नियम, १९५९ व त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणा व फेरबदल व त्या अनुषंगाने शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय/परिपत्रके इत्यादिंच्या अधिन राहून २०११-२०१२ या वित्तीय वर्षाकरिता उपलब्ध असलेल्या अनुदानातून, प्रमुख/मंजुरी अधिकारी यांनी केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने, घरबांधणी अग्रीम **एकूण रुपये ८८४८८४३/- (एकूण रुपये अठ्ठयाऐंशी लाख अठ्ठेचाळीस हजार आठशे त्रेचाळीस फक्त)** प्रमाणित करण्यात येत आहे.

| अ. क्र. | यादी क्रमांक | अर्जदारांची संख्या | प्रमाणित रक्कम रुपये |
|---|---|---|---|
| १ | यादी क्रमांक १ :- सर्व साधारण- (वर्ग-३ व त्यावरील अधिकारी व कर्मचारी) | २९ | ६६१०२७९ |
| २ | यादी क्रमांक २ :- मागास वर्ग (वर्ग ३ व त्यावरील अधिकारी व कर्मचारी) | ७ | १६३४३९४ |
| ३ | यादी क्रमांक ३ :- सर्व साधारण - (वर्ग ४ चे कर्मचारी) | ४ | ५३४८७० |
| ४ | यादी क्रमांक ४ :- मागास वर्ग (वर्ग-४ चे कर्मचारी) | १ | ६९३०० |
| | **एकूण** | **४१** | **८८४८८४३** |

**(एकूण रुपये अठ्ठयाऐंशी लाख अठ्ठेचाळीस हजार आठशे त्रेचाळीस फक्त)**

२. मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मध्ये विहित केलेल्या अटींच्या अधिन राहून प्रमाणित अग्रीमास मंजुरी देण्यापूर्वी अर्जदारांकडून तो निवृत्त होण्यापूर्वी संपूर्ण अग्रीमाची व्याजासह वसुली होईल व प्रकरणपरत्वे अर्जदाराने सर्व बाबींची / कागदपत्रांची पूर्तता केलेली आहे व ते स्थायी असल्याची

पूर्ण खात्री करुन घेतल्यावरच या अग्रीमास मंजुरी देण्यात यावी. **अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर अनुदान उपलब्ध असेपर्यंत** या अग्रीम धनास मंजुरी देऊन अग्रीमाची रक्कम कोषागारातून काढण्यात यावी. तसेच कोषागारातून रक्कम काढल्यानंतर ती रक्कम तीन दिवसाच्या आत संबंधित अर्जदाराला देण्यात यावी.

३. हा खर्च (मागणी क्रमांक जे-५) ७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादिना कर्जे (योजनेतर/दत्तमत) २०१(००)(०१)-घरबांधणीसाठी अग्रीम ( लेखाशीर्ष संकेतांक ७६१० ०४७ २) खाली खर्ची टाकण्यात यावा व २०११-२०१२ या वित्तीय वर्षाकरिता मंजूर झालेल्या लेखानुदानातून भागविण्यात यावा.

४. **जमीन खरेदी करुन घर बांधणे** या प्रयोजनासाठी अग्रीमाचा पहिला हप्ता मंजूर केल्यानंतर दुसरा हप्ता मंजूर करण्याची शिफारस करण्यापूर्वी अर्जदाराच्या घराचे मंजूर आराखडे स्थानिक प्राधिकरणाच्या मंजुरी आदेशाची प्रत व मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील प्रपत्र बी-१ मध्ये अर्जदाराने भरुन दिलेल्या गहाण खताची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

५. **घरबांधणी** प्रयोजनार्थ अग्रीम घेतले आहे अशा प्रकरणी अर्जदाराने बांधकाम विहित टप्प्यापर्यन्त पूर्ण केले आहे याची खातरजमा करावी व तसा अहवाल व त्या टप्प्यापर्यन्त करण्यात आलेल्या खर्चाच्या पावत्या शासनाकडे सादर कराव्यात. ज्या अर्जदाराना ३ रा व ४ था हप्ता / अंतिम हप्ता म्हणून प्रमाणित करण्यात आला आहे त्या अर्जदारांकडून नियमानुसार आवश्यक त्या संपूर्ण कागदपत्रांची पूर्तता करुन घेऊन नंतरच प्रत्यक्ष रक्कम प्रदान करावी.

६. **घरबांधणी** या प्रयोजनासाठी या पत्रानुसार प्रमाणित करण्यात आलेल्या अग्रीम धनास प्रत्यक्ष मंजुरी देण्यापूर्वी अर्जदाराने मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील प्रपत्र बी-२ मध्ये अर्जदाराने भरुन दिलेल्या गहाण खताची प्रत शासनास पाठविण्यात यावी.

७. **तयार घर खरेदी** या प्रयोजनासाठी अग्रीम प्रमाणित करण्यात आलेल्या अर्जदारांकडून मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील प्रपत्र ए-२ मध्ये करारनाम्याची प्रत अर्जदाराने भरुन घेण्यात आल्यावरच अग्रीमाची रक्कम प्रत्यक्षात अदा करण्यात यावी.

८. **घरखरेदीसाठी/घरबांधणीसाठी वित्तीय संस्थेकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड** या प्रयोजनासाठी अग्रीम प्रमाणित करण्यात आले आहे अशा अर्जदारांकडून अग्रीम मंजुरी पूर्वी त्यांच्या कर्ज शिलकीबाबतचे संबंधित वित्तीय संस्थेने दिलेले अलिकडील प्रमाणपत्र घेऊन प्रत्यक्ष उर्वरित कर्जाइतकेच अग्रीम मंजूर करावे.

९. ज्या अर्जदारांना हप्त्याने अग्रीम प्रमाणित करण्यात आले आहे अशा अर्जदारांकडून त्यांना मिळालेल्या अग्रीमाची वसुली, त्यावरील व्याजाची वसुली मुंबई वित्तीय नियम, १९५९ अंतर्गत परिशिष्ट २६ मधील तरतूदीनुसार प्रकरणपरत्वे करण्यात यावी.

१०. आपणांस असेही कळविण्यात येते की, सदर घरबांधणी अग्रीम मंजुरी आदेश काढतांना सदर सदनिकेचा वा घराचा विमा शासकीय विमा निधीकडेच उतरवावा अशी अट मंजुरी आदेशात घालावी व त्याचे काटेकोरपणे पालन होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर मंजुरी आदेशाची प्रत विमा संचालक

महाराष्ट्र राज्य गृहनिर्माण भवन, म्हाडा, २६४, पहिला मजला, वांद्रे (पूर्व ) मुंबई-४०० ०५१ यांनाही माहितीसाठी अग्रेषित करावी.

११. हे अग्रीमधन मंजूर केलेल्या आपल्या कार्यालयाच्या आदेशाची प्रत शासनास पाठविण्यात यावी. प्रत्यक्ष कोषगारातून रक्कम काढल्याचा दिनांक व प्रमाणक क्रमांकही त्वरीत कळविण्यांत यावा. तसेच प्रमाणित केलेल्या रकमेचा विनियोग विहित कालावधीत न झाल्यास प्रमाणित रक्कम **त्वरित** शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी. सदर रकमेचा विनियोग झाला किंवा कसे याबाबत या शासन पत्राच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत शासनास कळविण्यात यावे.

१२. आपणांस असेही कळविण्यात येते की, तयार घर खरेदी (जुने अथवा नवे) या प्रयोजनासाठी अर्जदारास शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक ३ घबाअ १०८७/(४६५)/विनियम, दिनांक ६.११.१९९० मधील विशिष्ट अटींच्या अधीन राहून व त्यामध्ये नमूद केलेली सक्षम अधिका-याने दिलेली कागदपत्रे सादर केलेली आहेत याची खात्री झाल्यावरच अग्रीम मंजूर करण्यात यावा.

१३. अर्जदारास ज्या प्रयोजनासाठी अग्रीम मंजूर करण्यात आले आहे त्याच प्रयोजनासाठी त्या रकमेचा अर्जदाराकडून विनियोग करण्यात आला याबद्दलचे विनियोग प्रमाणपत्र मंजुरी अधिका-याने शासनास पाठवावे.

१४. यादी क्रमांक २ व ४ मधील अर्जदार मागासवर्गीय असल्याची सेवापुस्तक किंवा जातीच्या दाखल्याच्या आधारे खात्री करुन घेतल्यानंतरच घरबांधणी मंजुरीचे आदेश काढावेत. सदर बाब १५ दिवसात पूर्ण न झाल्यास प्रमाणित रक्कम शासनास परत करण्यात यावी. जेणेकरुन सदर रक्कम इतर पात्र अर्जदारास प्रमाणित करणे शक्य होईल. जर काही कारणास्तव अग्रीम मंजूर करण्यात येत नसेल तर तसे शासनास त्वरीत कळविण्यांत यावे. तसे न झाल्यास यावरुन उद्‌भवणा-या अनियमिततेस सदर मंजुरी अधिकारी जबाबदार राहील याची कृपया नोंद घ्यावी.

१५. संबंधित अधिकारी आपल्या कार्यालयातून बदलून दुसरीकडे गेलेला असल्यास, **अर्थसंकल्पिय वित्तीय प्रणालीवर Athorisation Slip काढण्यापूर्वी,** त्याबाबतचा तपशील शासनास कळविण्यात यावा. तदनंतर त्या अनुषंगाने, **प्रणालीवर प्राधिकृत करण्यात आलेल्या रकमेमध्ये शासनाकडून आवश्यक ते बदल करण्यात आल्यानंतरच** देयक तयार करण्याबाबतची पुढील कार्यवाही संबंधित कार्यालयाने करावी.

१६. जर काही कारणास्तव अग्रीम मंजूर करण्यात येत नसेल तर तसे शासनास त्वरीत कळविण्यात यावे. तसेच प्रमाणित अग्रीमापेक्षा कमी रक्कम मंजूर करण्यात येत असेल तर तसेही समुचित तपशीलासह कळविण्यात यावे व प्रमाणित अग्रीमाची उर्वरित रक्कम या विभागास तात्काळ परत करण्यात यावी.

१७. घरबांधणी अग्रीमाच्या मुद्दलाची परतफेड 'घरबांधणी अग्रीम -७६१०-शासकीय कर्मचारी इत्यादिना कर्जे-२०१-घरबांधणीसाठी आगाऊ रकमा (७६१०-५०१-५०० )' या जमा शीर्षाखाली आणि व्याज '००४९-व्याज जमा-८००-इतर जमा ( संकेतांक ००४९ ००६ १०० ) शासकीय कर्मचा-यांना दिलेल्या कर्जावरील व्याज ४५ (१) घरबांधणी अग्रीम' या जमाशीर्षाखाली जमा करण्यात यावे.

१८.     या शासन पत्रान्वये प्रमाणित करण्यात आलेल्या अग्रीमावर वेळोवेळी विहित करण्यात आलेल्या दरानुसार व्याजाची आकारणी करण्यात यावी.

१९.     सोबतच्या यादीतील अर्जदारानी प्रमाणित केलेले घरबांधणी अग्रीम हे संबंधित अर्जदाराच्या कार्यालय प्रमुख/मंजुरी अधिकारी यांनी केलेल्या शिफारशीवरुन प्रमाणित करण्यात येत आहे. तेव्हा नियमांच्या अधीन राहून अग्रीमाचे वितरण करणे व ती वसुल करणे त्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यालय प्रमुख / मंजुरी अधिकारी यांची राहील.

२०.     **वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४९८/११, दि.१२/८/२०११ अन्वये सदर बाबीसाठी सहमती देण्यात आलेली आहे.**

२१.     सदरहू पत्र हे निधी उपलब्धता प्रमाणपत्र समजण्यात यावे.

आपला,

(बा.कि.रासकर)
शासनाचे अवर सचिव

**प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित-**

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई ( २ प्रती)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर ( २ प्रती)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
प्रबंधक, नगर दिवाणी व सत्र न्यायालय, मुंबई,
प्रबंधक, उच्च न्यायालय,नागपूर.
उच्च न्यायालय,रिट सेल,मुंबई.
सह सचिव, विधी व न्याय विभाग, नागपूर/औरंगाबाद,
जिल्हा व सत्र न्यायाधीश, नांदेड, अकोला, सिंधुदुर्ग, रत्नागिरी,धुळे, चंद्रपूर, जळगांव,अमरावती, अहमदनगर,गडचिरोली,बुलढाणा,गोंदिया,जालना.
जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड, अकोला, सिंधुदुर्ग, रत्नागिरी,धुळे, चंद्रपूर, जळगांव,अमरावती, अहमदनगर,गडचिरोली,बुलढाणा,गोंदिया,जालना.
विधी व न्याय विभाग (कार्यासन २३ व २४),
निवड नस्ती.

**शासन पत्र क्रमांक : घबांअ-१०११(४)/(प्र.क्र. ४७/११)/पाच, दिनांक १६ आक्टोबर,२०११**

**सोबतचे विवरणपत्र - यादी क्रमांक १**

**सर्वसाधारण/अमागास (वर्ग ३ व त्यावरील अधिकारी व कर्मचारी )**

| अ.क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजुरी अधिकारी | प्रयोजन | एकूण प्रमाणित अग्रिम | या शासन पत्रान्वये प्रमाणित करण्यात आलेले अग्रीम | हप्ता/ एक रकमी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | श्री.एस.के.पाटील, लिपिक | न. दि. व स. न्या.मुंबई | नवीन घर बांधणी | ३५६२५० | १०६८७५ | ३रा हप्ता (३०%) | शिफारशीनुसार |
| २ | श्री. आर. अ.माने, क.लि. | जि.व स.न्या. नांदेड | नवीन घर बांधणी | ३४५००० | १३८००० | १३८००० (२रा हप्ता) | शिफारशीनुसार |
| ३ | श्री.डी.जे. अलकारी, व.लि. | जि.व स.न्या. अकोला | तयार घर खरेदी | ३७५००० | ३७५००० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ४ | श्री.व्ही.एम.नवले, ल.ले. | जि.व स.न्या. अकोला | कर्ज परतफेड | ४१२५०० | ४००८२५ | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ५ | श्रीमती मनिषा र. परब,क.लि. | जि.व स.न्या. सिंधुदुर्ग | कर्ज परतफेड | ३१५००० | ३००००० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ६ | श्री. रा. स. पाटील, व. लि. | जि. व स. न्या. धुळे | कर्ज परतफेड | २९३०४८ | २९३०४८ | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ७ | श्री. कै. पुं. भावसार, क. लि. | जि. व स. न्या. जळगांव | नविन घर बांधणी | ३६०००० | १४४००० | ३ रा हप्ता४०% | शिफारशीनुसार] १ला व २रा हप्ता ३० % प्रमाणे दिला आहे. |
| ८ | श्री. बा. ह. गोसावी, बेलिफ | जि. व स. न्या. जळगांव | नविन घर बांधणी | २४०००० | ९६००० | ३ रा हप्ता ४०% | शिफारशीनुसार] १ला व २रा हप्ता ३० % प्रमाणे दिला आहे. |
| ९ | श्री. दे. वा. वाडोदे, उ.ल.ले. | वि. व न्या. वि. नागपूर | कर्ज परतफेड | ४४५००० | ४४५००० | एकरकमी | क . घबांअ १००९/(७) प्र.क्र. ३७/०९ /पाच दि. १२/११/०९ अन्वये देण्यात आले होते. तथापि कागदपत्रांची पूर्तता न केल्याने संबंधित कार्यालयाने अग्रिम प्रदान केले नाही. प्रस्ताव फेरसादर |
| १० | श्री. रु. शं.चांदोरे, लि. टं. | वि. व न्या. वि. नागपूर | कर्ज परतफेड | २१०००० | २१०००० | एकरकमी | |
| ११ | श्री. ओ. के. नंदवंशी, व. लि. | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | ३९०००० | ११७००० | १ला हप्ता (३०%) | शिफारशीनुसार |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १२ | श्री. एस. एस. खाकसे,क. लि. | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | ३३०००० | २३१००० | ४० व ३० | शिफारशीनुसार |
| १३ | श्री. वाय. एम. बारमासे, क. लि. | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | ३३०००० | १३२००० | २ रा हप्ता ४०% | शिफारशीनुसार |
| १४ | श्री. व्ही. आर काटोले, बेलिफ | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | २७३००० | ८१९०० | ३रा हप्ता ३०% | शिफारशीनुसार |
| १५ | श्री. धु.रा.भंडारे, क. लि. | जि. व स. न्या.नांदेड | नविन घर बांधणी | २६८१५० | ८०४४५ | ३ रा हप्ता ३०% | शिफारशीनुसार |
| १६ | श्री.ए.का.गटूल. बेलिफ | जि. व स. न्या.नांदेड | जमिन खरेदी करुन घर बांधणी | १७५००० | १७५००० | एकरकमी | शिफारशीनुसार |
| १७ | श्री.सी. एन. चव्हाण. व. लि. | जि. व स. न्या. अहमदनगर | नविन घर बांधणी | ३९०००० | १५६००० | २ रा हप्ता ४०% | शिफारशीनुसार |
| १८ | सौ. एल. आर. बोरकर, व. लि | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | ३९७५०० | ११९१०० | पहिला हप्ता ३०% | शिफारशीनुसार |
| १९ | श्री. यु. एम. चव्हाण, बेलिफ | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | २७३००० | ८१००० | पहिला हप्ता ३०% | शिफारशीनुसार |
| २० | श्री. यु. जें. देशमुख, व. लि. | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | ३३०००० | २३१००० | दुसरा व तिसराहप्ता ७०% | शिफारशीनुसार |
| २१ | श्री. एस. के. वानखेडे, क. लि. . | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | ३२०००० | २२४००० | दुसरा व तिसराहप्ता ७०% | शिफारशीनुसार |
| २२ | श्री. जी. बी. काळे, क. लि. | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | ३२१००० | १२८४०० | दुसरा हप्ता ४०% | शिफारशीनुसार |
| २३ | श्री. सी.बी. पवार, क. लि. | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | ३४५००० | १३८००० | दुसरा हप्ता ४०% | शिफारशीनुसार |
| २४ | श्रीमती.एस.आर.मंडपे, लिपिक | उच्च न्या. नागपूर | कर्ज परतफेड | ४१२५०० | ४१२५०० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| २५ | श्री. पी.ए.तायडे, लघुलेखक | जि व स.न्या. जालना | नविन घर बांधणी | ५०४४०० | ३५३०८० | दुसरा व तिसरा हप्ता ७० % | शिफारशीनुसार |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| २६ | श्रीमती सी.जे भट, असोसिएट | उ..न्या . (मू.शा) मुंबई | कर्ज परतफेड | ६४६२५० | ६४६२५० | एक रकमी | नियमानुसार |
| २७ | श्री.स.द.जावरकर, क.लि | जि व स.न्या. गडचिरोली | नविन घर बांधणी | ३४५००० | १०३५०० | पहिला हप्ता ३०% | शिफारशीनुसार |
| २८ | श्री.नि.ज.करांडे, क.लिपिक | जि व स.न्या. बुलढाणा | नविन घर बांधणी | ३०८२५० | २१५७७५ | दुसरा व तिसरा हप्ता ७० % | शिफारशीनुसार |
| २९ | श्री.एस.एन.राजे, लिपिक | प्रबंधक, उच्च न्या.नागपूर | कर्ज परतफेड | ५१७५०० | ४७५५८१ | एक रकमी | नियमानुसार |
| | | | | **एकूण रुपये** | **६६१०२७९** | | |
| **(एकूण रुपये सहासष्ट लाख दहा हजार दोनशे एकोणऐंशी फक्त)** | | | | | | | |

**शासन पत्र क्रमांक : घबांअ-१०११(४)/(प्र.क्र. ४७/११)/पाच, दिनांक १४ आक्टोबर,२०११**

**सोबतचे विवरणपत्र - यादी क्रमांक २**

**मागासवर्गीय (वर्ग ३ व त्यावरील) अधिकारी व कर्मचारी**

| अ.क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजुरी अधिकारी | प्रयोजन | एकूण प्रमाणित अग्रिम | या शासन पत्रान्वये प्रमाणित करण्यात आलेले अग्रीम | हप्ता/ एक रकमी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्रीमती अंजली स.खताते,क.लि. | जि.व स.न्या. सिंधुदुर्ग | कर्ज परतफेड | २९६२५० | २९६००० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| २ | श्री. प्रदिप अ. रायकर,क.लि. | जि.व स.न्या. रत्नागिरी | नवीन घर बांधणी | ३३०००० (तीन हप्ते) | ९९००० | १ला हप्ता (३०%) | शिफारशीनुसार |
| ३ | श्री.ज.रा.हंकारे ,लि.-ट | उच्च न्या. रिट सेल,मुबई | राहत्या घराचा विस्तार | १८०००० | १८०००० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ४ | श्री. व्ही. जी. भावसार, क. लि. | जि. व स. न्या. धुळे | कर्ज परतफेड | ३१४००० | २३४४६९ | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ५ | श्री. एस.एन. झाडे , व.लि. | जि.व स.न्या. चंद्रपूर | कालांतराने घर बांधण्यासाठी जमिन खरेदी | १८०००० | १८०००० | एक रकमी | शिफारशीनुसार |
| ६ | श्री.दि.रा.जांभोळे, अधिक्षक | उच्च न्यायालय (रिट सेल) मुंबई | कर्ज परतफेड | ४२५६५० | ४२५६५० | एक रकमी | नियमानुसार |
| ७ | श्री. आर. बी. जाधव, लि.- टं. | वि. व न्या. वि. औरंगाबाद | नविन घर बांधणी | ३१३२५० | २१९२७५ | १ला व २ रा हप्ता (७०%) | शिफारसीनुसार |
| | | | | **एकूण रुपये** | **१६३४३९४** | | |

**(एकूण रुपये सोळा लाख चौतीस हजार तीनशे चौ-याणव फक्त)**

**शासन पत्र क्रमांक : घबांअ-२०११(४)/(प्र.क्र. ४७/११)/पाच, दिनांक १८ आक्टोबर,२०११**
**सोबतचे विवरणपत्र - यादी क्रमांक ३**
**सर्वसाधारण/अमागास (वर्ग ४ चे कर्मचारी )**

| अ.क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजुरी अधिकारी | प्रयोजन | एकूण प्रमाणित अग्रिम | या शासन पत्रान्वये प्रमाणित करण्यात आलेले अग्रीम | हप्ता/ एक रकमी | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. जी. जी. पवार, शिपाई | जि. व स. न्या. अमरावती | नविन घर बांधणी | २४३००० | ७२९०० | ३ रा हप्ता ३०% | शिफारशीनुसार |
| २ | श्री. अ. उ. शेख, शिपाई | जि. व स. न्या. अहमदनगर | कर्ज परतफेड | २१७५०० | २१७५०० | एकरकमी | शिफारशीनुसार |
| ३ | श्रीमती क. चं.राठोड, हमाल | न. दि. व स. न्या.मुंबई | राहत्या घराचा विस्तार | १८०००० | १८०००० | एकरकमी | शिफारशीनुसार |
| ४ | श्री.जी.आर.मगर, शिपाई | उ.न्या .(अ.शा) मुंबई | नविन घर बांधणी | २१४९०० | ६४४७० | पहिला हप्ता ३०% | नियमानुसार |
| | | | | **एकूण रुपये** | **५३४८७०** | | |

**(पाच लाख चौतीस हजार आठशे सत्तर)**

| शासन पत्र क्रमांक : घबांअ-२०११(४)/(प्र.क्र. ४७/११)/पाच, दिनांक १३ आक्टोबर,२०११<br>सोबतचे विवरणपत्र - यादी क्रमांक ४<br>मागासवर्गीय (वर्ग ४ चे कर्मचारी ) | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| अ.क्र. | अर्जदाराचे नाव व पदनाम | मंजुरी अधिकारी | प्रयोजन | एकूण प्रमाणित अग्रिम | या शासन पत्रान्वये प्रमाणित करण्यात आलेले अग्रीम | हप्ता/ एक रकमी | शेरा |
| १ | श्री.चं.बा.पाटील, शिपाई | जि व स.न्या. जळगांव | नविन घर बांधणी | २३१००० | ६९३०० | तिसरा हप्ता ३०% | शिफारशीनुसार |
| | | | | एकूण रुपये | ६९३०० | | |
| (एकूण रुपये एकोणसत्तर हजार तीनशे फक्त) | | | | | | | |

| शासन पत्र क्रमांक : घबांअ-२०११(४)/(प्र.क्र. ४७/११)/पाच, दिनांक ७ आक्टोबर,२०११ | | |
|---|---|---|
| यादी क्रमांक | अर्जदारांची संख्या | रक्कम रुपये |
| १ | २९ | ६६१०२७९ |
| २ | ७ | १६३४३९४ |
| ३ | ४ | ५३४८७० |
| ४ | १ | ६९३०० |
| एकूण रुपये | ४१ | ८८४८८४३ |
| (एकूण रुपये अठ्ठयाऐंशी लाख अठ्ठेचाळीस हजार आठशे त्रेचाळीस फक्त) | | |

(बा.कि.रासकर)
शासनाचे अवर सचिव